**कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियानाची सन २०१९-२० मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी अनुसुचित जमाती प्रवर्गाचा ₹७.८५ कोटी निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्ध विकास व मत्स्य व्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. राफअ-२०१९/प्र.क्र.२००/९-अे**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०३ डिसेंबर, २०१९

**वाचा:-** (१) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०१९
(२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८ जूलै, २०१९
(३) केंद्र शासनाच्या कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे इंग्रजी पत्र F.No. 33-17/2017-MIDH(AAP), Dated:11 July, 2019
(४) संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांचे क्र.मराफऔवमं/सनि/वाकृआ/प्रशा. मान्यता/२०१३/२०१९, दि.२३.०८.२०१९ चे पत्र.
(५) केंद्र शासनाच्या कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभागाची इंग्रजी पत्रे क्र. F.No.18-24 / 2017/MIDH, Dated: 6th September, 2019
(६) संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे जा.क्र.मराफऔवमं / लेखा/२११३/२०१९, दिनांक ११.०९.२०१९ चे पत्र.
(७) शासन निर्णय, कृषी व पदुम विभाग, क्र: राफअ-२०१९/प्र.क्र.१८६/९-अे, दिनांक १८ सप्टेंबर, २०१९

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने दिनांक १ एप्रिल २०१४ पासून राष्ट्रीय फलोत्पादन अभियान (NHM), उत्तर पूर्व आणि हिमालयीन राज्यासाठी फळबाग अभियान (HMNEH), राष्ट्रीय बागवानी मंडळ (NHB), नारळ विकास मंडळ (CDB) व केंद्रीय फलोत्पादन संस्था (CIH) या सर्व योजनांचे एकत्रिकरण करुन एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (Mission for Integrated Development of Horticulture) राबविण्याचा निर्णय घेतला आहे. सदर योजना ही फळे, भाजीपाला, कंदमुळे, मश्रूम, मसाले, फूल, सुगंधी वनस्पती, नारळ, काजू, कोको आणि बांबू इ. उत्पादनांच्या चतुरस्त्र विकासाकरिता राबविण्यात येणारी केंद्रपुरस्कृत योजना आहे. सदर योजना सन २०१५-१६ पासून केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० या प्रमाणात राबविण्यात येत आहे.

केंद्र शासनाने उपरोक्त वाचा येथे नमूद केलेल्या क्रमांक ३ येथील पत्रान्वये राज्यात एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान सन २०१९-२० मध्ये राबविण्यासाठी (नवीन कार्यक्रमासाठी ₹ १४६.४० कोटी व स्पील ओव्हर/कमीटेड कार्यक्रमासाठी ₹ ११६.९३ कोटी) असा एकूण ₹ २६३.३३३२ कोटी रक्कमेचा वार्षिक कृती आराखडा मंजूर केला आहे. त्यानुसार उपरोक्त वाचा येथे नमूद केलेल्या क्रमांक ७ येथील शासन निर्णयान्वये सदर योजना सन २०१९-२० मध्ये राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाने उपरोक्त वाचा येथे नमूद केलेल्या क्रमांक ५ येथील पत्रान्वये अनुसुचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा पहिल्या हप्त्याचा निधी ₹ ४.७१ कोटी राज्य शासनास वितरित केला असून त्यास समरुप राज्य शासनाचा निधी ₹ ३.१४ कोटी असा एकूण ₹ ७.८५ कोटी निधी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, तथा आयुक्त (कृषी), पुणे यांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानांतर्गत केंद्र शासनाच्या कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभागाच्या दिनांक ०६.०९.२०१९ च्या पत्रान्वये अनुसुचित जमाती प्रवर्गासाठी वितरित केलेला केंद्र शासनाचा पहिल्या हप्त्याचा निधी ₹४.७१ कोटी व त्यास समरुप राज्य हिश्श्याचा ४० % निधी ₹३.१४ कोटी असा एकूण ₹७.८५ कोटी निधी मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीमधून खर्च करण्यास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा अर्थसंकल्पित निधी केंद्र शासनाने विहीत केल्याप्रमाणे अनुसुचित जमाती प्रवर्गासाठी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा (६० टक्के) | राज्य हिस्सा (४० टक्के) |
|---|---|---|
| अनुसुचित जमाती | मागणी क्र. - टी -५<br>२४०१ - पीक संवर्धन<br>७९६-अनुसुचित जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१- अनुसुचित जनजाती क्षेत्र उपयोजना अंतर्गत योजना<br>(०१) (०६) -कृषि उन्नती योजना- एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (अनुसूचित जनजाती) (कें.पु.यो.) (केंद्र हिस्सा ६० टक्के)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१A०२९) | मागणी क्र. - टी-५,<br>२४०१ - पीक संवर्धन<br>७९६-अनुसुचित जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१-अनुसूचित जनजाती क्षेत्र उपयोजना अंतर्गत योजना<br>(०१) (०७) - कृषि उन्नती योजना -एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (अनुसूचित जनजाती)(कें.पु.यो.)(राज्य हिस्सा ४० टक्के)<br>३३ -अर्थसहाय्य (२४०१A०११) |

३. सदर अभियानाकरिता वितरित करण्यात आलेला निधी कोषागारातून आंहरित करण्याकरिता लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषी), पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. योजनेंतर्गत वितरित निधी जिल्हा स्तरावरुन खर्च करण्यात यावा. तसेच आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

५. सदर योजनेंतर्गत वेळोवेळी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (कृषी) यांनी शासनास सादर करावे.

६. प्रस्तुत आदेश, वित्त विभागाने उपरोक्त वाचा येथील क्रमांक १ व २ येथील परिपत्रकान्वये व आदिवासी विकास विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २८४ कार्यासन-६, दिनांक २६.११.२०१९ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०४१६४५५२२८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2019.12.04 16:50:39 +05'30'

**(अशोक आत्राम)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रती :-**

१. मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.

२. मा.मंत्री (फलोत्पादन), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे खाजगी सचिव,
३. मा. राज्यमंत्री (कृषी व फलोत्पादन), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे खाजगी सचिव,
४. सर्व सन्माननीय विधानपरिषद / विधानसभा सदस्य,महाराष्ट्र राज्य.
५. मा. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
६. मा.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ० ३२,
७. मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. मा. सचिव (कृषी), कृषी प पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे,
१२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पणन मंडळ, पुणे,
१३. संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
१४. राज्यातील सर्व विभागीय कृषी सह संचालक,
१५. राज्यातील सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
१६. विविध राष्ट्रीय मंडळावरील महाराष्ट्राचे सदस्य म्हणून कार्यरत असलेल्या जिल्ह्यातील व्यक्ती,
१७. राज्यातील फळे/फुले उत्पादक संघाचे प्रतिनिधी,
१८. निवडनस्ती, कार्यासन ९- अे.